जिल्हा परिषद, नाशिक येथील अधिकारी/ कर्मचारी यांना संगणक/लॅपटॉप व डोंगल खरेदीसाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

### शासन आदेश क्रमांकः आयटी-२०१८/प्र.क्र.९५ /मातंक

बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ
फोर्ट,मुंबई-४००००१
तारीख: २१ डिसेंबर,२०१८

वाचा-

१) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांचे दि.१/११/२०१८ रोजीचे पत्र.**

२) **दि.६/१२/२०१८ रोजी घालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त**

प्रस्तावना-

विभागातील प्रोजेक्ट मॅनेजमेंट सिस्टिम, लाएबिलिटी रजिस्टर सिस्टिम, कॅडर मॅनेजमेंट सिस्टिम, जिल्हा परिषद फंड मॉनिटरिंग सिस्टिम या संगणक प्रणालींची परिणामकारकरित्या अंमलबजावणी करण्यासाठी प्रत्येक कर्मचाऱ्याकडे संगणक असणे आवश्यक आहे ही बाब विचारात घेऊन जिल्हा परिषद नाशिक कडून कार्यालयीन वापरासाठी १८३ लॅपटॉप, ४१ संगणक व २२४ डोंगल खरेदी करण्याचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार यासाठी येणाऱ्या रू.८५,२६,२२५/- इतक्या खर्चास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहेत-

## शासन आदेश -

विभागात सुरू असणाऱ्या प्रोजेक्ट मॅनेजमेंट सिस्टिम, लाएबिलिटी रजिस्टर सिस्टिम, कॅडर मॅनेजमेंट सिस्टिम, जिल्हा परिषद फंड मॉनिटरिंग सिस्टिम यांसारख्या विविध ई-गव्हर्नन्स प्रकल्पांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा परिषद नाशिक येथील अधिकारी/ कर्मचाऱ्यांकरिता संगणक/लॅपटॉप व डोंगल यांची खरेदी Bring Your Own Device या तत्वावर करण्यास व त्यासाठी येणाऱ्या रू.८५,२६,२२५/- (रू.पंच्याऐंशी लक्ष सव्वीस हजार दोनशे पंचवीस फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्याचे या विभागाच्या दि.६/१२/२०१८ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये प्रस्तावित करण्यात आले होते. समितीने सदर प्रस्तावाला मान्यता दिली आहे.

२. प्रकल्प अंमलबजावणी समितीची वरीलप्रमाणे मान्यता विचारात घेऊन जिल्हा परिषद नाशिक येथील अधिकारी/ कर्मचाऱ्यांकरिता संगणक/लॅपटॉप व डोंगल खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रू.८५,२६,२२५/- (रू.पंच्याऐंशी लक्ष सव्वीस हजार दोनशे पंचवीस फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. त्यानुसार सदर निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरित करण्यात यावा. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक यांनी सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. सदर खर्च “लेखाशिर्ष ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा-(०१)(०३)- ई गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी १७ संगणक खर्च-(३४५१ २८०८) मागणी क्रमांक एल-४ (योजनांतर्गत) (दत्तमत)” या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध झालेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदरचा शासन आदेश वित्त विभाग, क्रमांक: विअप्र- २०१३ /प्र.क्र.३० /२०१३ /विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्ठातील भाग पहिला, उपविभाग दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक-७६, अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२११११०२४०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandit Jadhav

Digitally signed by Pandit Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, cn=Pandit Jadhav
Date: 2018.12.21 16:46:31 +05'30'

**(पं.खं.जाधव)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
२. उप सचिव,(रोखशाखा),ग्रामविकास विभाग, मंत्रालय.मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
४. कक्ष अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी (रोख शाखा), ग्रामविकास विभाग,मंत्रालय.मुंबई
५. निवड नस्ती व बजेट नस्ती ( माहिती तंत्रज्ञान कक्ष), ग्रामविकास विभाग , मंत्रालय.मुंबई